**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागामार्फत तसेच या विभागाच्या अधिनस्त कार्यालयामार्फत आयोजित कार्यक्रम, समारंभ इ.च्या वेळी आमंत्रित मान्यवर व्यक्ती आणि अधिकारी यांचे स्वागत पुस्तक देऊन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- संकीर्ण-२०१५/ प्र.क्र. २०० /आस्थापना**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक -१५ ऑक्टोबर, २०१५

**प्रस्तावना:**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागामार्फत तसेच या विभागाच्या अधिनस्त कार्यालयामार्फत विविध कार्यक्रम, समारंभ आयोजित करण्यात येतात.अशा कार्यक्रमाच्या वेळी मान्यवर व्यक्ती व अधिकारी याचे स्वागत सर्वसाधारणपणे पुष्पगुच्छ देऊन केले जाते. पुष्पगुच्छ तयार करण्यासाठी कोणत्या ना कोणत्या परिसरातील झाडांच्या फांद्या, पाने, फुले आणि वृक्षवेली तोडली जातात. त्यामुळे दुर्मिळ पक्षी आणि इतर लहान वन्यजीव यांचा अधिवास आणि अन्नसाखळी प्रभावित होते. तसेच त्या परिसरातील निसर्ग सौंदर्याची जपवणूक करण्यावर परिणाम होतो. तेव्हा मान्यवर व्यक्तींचे अशा ठिकाणी स्वागत करतांना पुष्पगुच्छ देण्याऐवजी पुस्तक भेट दिल्यास त्यामधील माहिती आणि ज्ञानाचा प्रसार आणि प्रचार होईल.

**परिपत्रक -**

प्रस्तावनेतील नमूद विविध बाबींचा विचार करुन यापुढे विभागामार्फत तसेच या विभागाच्या अधिनस्त क्षेत्रिय कार्यालयामार्फत आयोजित करण्यात येणारे विविध कार्यक्रम, समारंभ, महोत्सव, पुरस्कार समारंभ इत्यादिच्यावेळी आमंत्रित मान्यवर व्यक्ती तसेच अधिकारी यांचे स्वागत करताना पुष्पगुच्छ देण्याऐवजी, पुस्तक भेट देऊन त्यांचे स्वागत करण्यात यावे. विशेषत: सेवेमधील किंवा सेवानिवृत्त झालेल्या अधिकारी/कर्मचारी यांनी लिहिलेली पुस्तके किंवा अन्य माहिती पुस्तिका भेट देण्यास प्राधान्य देण्यात यावे.

२. त्याचप्रमाणे अन्य ठिकाणी विभागामार्फत तसेच अधिनस्त कार्यालयामार्फत होणाऱ्या बैठका, समारंभ आणि इतर कार्यक्रमाच्या वेळी देखील सन्माननीय व्यक्तींचे स्वागत अशाच पध्दतीने करण्यात यावे.

३. उपरोक्त सूचनांनुसार विभागातील अधिकाऱ्यांनी तसेच या विभागाच्या अधिनस्त विभाग प्रमुखांनी काटेकोरपणे कार्यवाही करावी. तसेच विभाग प्रमुखांनी त्यांच्या अधिपत्त्याखालील क्षेत्रिय कार्यालय प्रमुखांना वरील सूचनानुसार कार्यवाही करण्याच्या सुचना द्याव्यात.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५१०१५१८२८५४३३२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

Basawaraj G Saidanawaru

Digitally signed by Basawaraj G Saidanawaru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism & Cultural Affairs, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Basawaraj G Saidanawaru
Date: 2015.10.16 11:30:56 +05'30'

(ब.गु.सैदानवरु)
शासनाचे उपसचिव

**प्रति,**

१.मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई
२.मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३.मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४.सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पर्यटन विकास महामंडळ, मर्यादित, मुंबई
६.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव (पूर्व), मुंबई.
७.संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८.संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९.संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई
१०.प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई.
११.कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई
१२.सचिव, रंगभूमी प्रयोग निरीक्षण मंडळ, मुंबई
१३.व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी, कोल्हापूर
१४.सहसंचालक, हिंदी, सिंधी व गुजराती साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५.विभागातील सर्व अधिकारी
१६.निवड नस्ती.